GR/1

अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील व्यक्तींना द्यावयाच्या जाती प्रमाणपत्र देण्याच्या कार्यपध्दतीबाबत....

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक-सीबीसी १०/२००१/प्रक्र-१२०/मावक-५
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक :२८ ऑक्टोबर,२००५

वाचा : (१) शासन निर्णय, सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक-सीबीसी १०/२००१/प्रक्र-१२०/मावक-५ दिनांक १ नोव्हेंबर,२००१

**शासन निर्णय** : अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील व्यक्तींना द्यावयाच्या जाती प्रमाणपत्र देण्याच्या कार्यपध्दती संदर्भाधीन दिनांक १ नोव्हेंबर,२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. तथापि विमुक्त जाती भटक्या जमातीची व्यक्ती विमुक्त जाती भटक्या जमातीच्या यादीतील काही जातींना जातीची प्रमाणपत्रे मिळविताना वास्तव्याच्या व जातीच्या पुराव्याबाबत ब-याच अडचणी येतात. त्यामुळे ते त्या जातीचे असून सुध्दा त्यांना जातीची प्रमाणपत्रे सक्षम प्राधिका-याकडून दिली जात नाहीत. याचे प्रमुख कारण असे आहे की,भटक्या जमातीतील व्यक्ती ह्या समुहाने उदरनिर्वाहासाठी बाराही महिने भटकत असतात. त्यामुळे त्यांचे वास्तव्याचे ठिकाण कायम स्वरुपी नसते. सदरचा समाज हा खूपच अशिक्षित असल्यामुळे त्यांच्या जातीबाबतच्या नोंदीचे कागदोपत्री पुरावे जातीचे प्रमाणपत्र देणा-या सक्षम प्राधिका-याकडे सादर करु शकत नाहीत ही वस्तुस्थिती आहे. त्यामुळे भटक्या जमातीतील काही जातीच्या लोकांना ते मागासवर्गीय असून सुध्दा त्यांना जातीची प्रमाणपत्रे मिळू शकत नाहीत. सदरची त्यांची अडचण दूर करण्यासाठी ते सध्या रहात असलेल्या ठिकाणच्या सरपंच आणि तलाठी यांनी भटक्या जमातीची एखादी व्यक्ती त्यांच्या गावाच्या कार्यक्षेत काही ठराविक वर्षे सातत्याने रहात असेल अशा प्रकरणी संबंधीत गांवच्या सरपंच आणि तलाठी यांनी त्या व्यक्तींच्या सध्याच्या रहिवासाबाबत तसेच जातीबाबत प्रमाणित केलेले जातीचे व वास्तव्याचे प्रमाणपत्र सक्षम प्राधिका-याकडे सादर केल्यास तो पुरावा म्हणून विचारात घ्यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(वि.वा.मेहेर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति :
मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री/राज्यमंत्री,
सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,

सचिव,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई,
प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा दंडाधिकारी/सर्व जिल्हाधिकारी/सर्व उप जिल्हाधिकारी,
सर्व विभागीय आयुक्त
सर्व उप विभागीय अधिकारी (महसूल),
सर्व अतिरिक्त आयुक्त (महसूल), नाशिक/मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/अमरावती
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
संचालक,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक,विमुक्त जाती,भटक्या जमाती,इतर मागासवर्ग आणि वि.मा.प्र.संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे आयुक्त, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य,नाशिक
सर्व मंत्रालयीन विभाग,

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांना याबाबतच्या सूचना द्याव्यात.

निवड नस्ती-भाव क्र-५,सा.न्या.सां.का.व वि.स.विभाग,मंत्रालय